

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक:- संकीर्ण २०२०/प्र.क्र.९४/झोपनि-२,**
मंत्रालय, ३ रा मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - २२ फेब्रूवारी, २०२२.

**विषय -:** **कै. मनोहर लक्ष्मण जाधव, शिपाई, उपजिल्हाधिकारी (अति/निष्का), चेंबूर यांचा कोविड-१९ संसर्गाने मृत्यू झाल्यामुळे त्यांच्या कुटुंबियांना रुपये ५० लाख सानुग्रह अनुदान मंजूर करण्याबाबत**

**संदर्भ -:** १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र. ४/व्यय-९, दि. २९.५.२०२०.
२) जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांचे पत्र क्र. आस्था/१एल/कोरोना मृत्यू/कावि-२०८/२०२०, दि. २९/०५/२०२०

**ज्ञापन :-**

अपर जिल्हाधिकारी (अतिक्रमण/निष्कासन), पूर्व उपनगरे कार्यालयाच्या अधिनस्त उपजिल्हाधिकारी, (अतिक्रमण/निष्कासन), चेंबूर या कार्यालयात कार्यरत असलेले कै. मनोहर लक्ष्मण जाधव, शिपाई यांचा शासकीय कर्तव्यावर असताना कोरोना विषाणूच्या संसर्गाने दिनांक २७.६.२०२० रोजी मृत्यू झाला आहे.

२. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांनी कै. मनोहर लक्ष्मण जाधव, शिपाई यांच्या कुटुंबियांना वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०२०/प्र.क्र. ४/व्यय-९, दि. २९.५.२०२० नुसार रुपये ५० लाख इतक्या रकमेचे सानुग्रह सहाय्य मंजूरीचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

३. कै. मनोहर लक्ष्मण जाधव, शिपाई हे काविड-१९ विषाणूच्या पार्श्वभूमीवर "मदत कार्य" यासंबंधीच्या कर्तव्यावर उपस्थित होते, असे सदरच्या प्रस्तावामध्ये नमूद केले आहे.

४. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांनी कै. मनोहर लक्ष्मण जाधव, शिपाई हे प्रथमत: बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या शताब्दी रुग्णालयामध्ये व तद्नंतर त्यांना श्री सिध्दी मल्टीस्पेशालिटी हॉस्पिटल, गोवंडी या रुग्णालयामध्ये दाखल केले होते. रुग्णालयात दाखल करण्यापूर्वी १४ दिवसांच्या काळात ते कार्यालयाच्या कर्तव्यावर हजर होते, असे जिल्हाधिकारी कार्यालय, मुंबई उपनगर यांनी दि. ५.८.२०२० च्या प्रमाणपत्रान्वये प्रमाणित केले आहे.

५. बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई यांच्या दिनांक १७.७.२०२० रोजीच्या मृत्यू प्रमाणपत्रामध्ये कै. मनोहर लक्ष्मण जाधव यांचा मृत्यू दि. २७.६.२०२० रोजी झाल्याचे नमूद करण्यात आले आहे.

६. त्यानुसार उपजिल्हाधिकारी, (अतिक्रमण/निष्कासन), चेंबूर या कार्यालयात कार्यरत असलेले कै. मनोहर लक्ष्मण जाधव, शिपाई यांच्या कुटुंबियांना रुपये ५०.०० लाख (अक्षरी रुपये पन्नास लाख फक्त) इतके इतक्या रकमेचे सानुग्रह सहाय्य म्हणून प्रदान करण्यास या ज्ञापनाद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

७.   उक्त खर्च "मागणी क्र.क्यु-३, मुख्य लेखाशिर्ष २२१६ गृहनिर्माण (०२) नागरी गृहनिर्माण (०३) (०७) अपर जिल्हाधिकारी (अतिक्रमणे/निष्कासन), पूर्व उपनगरे (२२१६ १३२७), १३-कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

८.   सदरचे ज्ञापन वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र. ४/व्यय-९, दि. २९.५.२०२० नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९.   सदरचे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०२२०२२२१२४६१४०७०९ असा आहे. सदर ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

PRAVEEN D TALEKAR

Digitally signed by PRAVEEN D TALEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9718d2c8dd5ec1fd02bae9294c6516cd2f2f47a279c9208754ca3343bce01f33, pseudonym=FDABF047F75202D4DC5EBD54263D7B717E8132E5, serialNumber=4D84A2FC3DE15B99A879241D47558F1E304C138E10289D84A103D4BE3699767C, cn=PRAVEEN D TALEKAR
Date: 2022.02.22 12:50:21 +05'30'

**( प्रवीण तळेकर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर.
३. अपर जिल्हाधिकारी (अति/निष्का), पूर्व उपनगरे, मुंबई.
४. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-४०० ०५१.
७. उपजिल्हाधिकारी (अति/निष्का), चेंबूर.
८. कै.मनोहर लक्ष्मण जाधव यांचे कुटुंबिय (उपजिल्हाधिकारी (अति/निष्का), चेंबूर यांचेमार्फत)
९. निवड नस्ती, झोपनि-२.